ग्रामपंचायत लेखा परीक्षणाची
सुधारीत कार्यपध्दती.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः लेखाप-२०१४/प्र.क्र ५५ / वित्त-४.

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीखः १८ नोव्हेंबर, २०१४.

<u>वाचा -</u>

१. **शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.लेखाप २००७/प्र.क्र.७१२/ वित्त-४, दिनांक २४ सप्टेंबर,२००८.**
२. **शासन पत्र, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.लेखाप २००७/प्र.क्र.७१२/वित्त-४, दिनांक २९ नोव्हेंबर,२००८.**
३. **शासन पत्र ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-लेखाप-२०१३/प्र.क्र.६/वित्त-४, दिनांक ५/२/२०१३ चे पत्र.**
४. **प्रधान सचिव(वित्त) वित्त विभाग,यांचे अ.शा.पत्र क्र.संकीर्ण-१०१३/प्र.क्र.१७/कोषा प्रशा-५, दिनांक २५/६/२०१३.**
५. **शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.लेखाप २०१३/प्र.क्र.६/वित्त-४ दिनांक २९ ऑक्टोबर,२०१३.**
६. **शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्र.संकिर्ण १०१३/ प्र.क्र.५१/ कोषा प्रशा-४, दिनांक २ ऑगस्ट,२०१४.**

**<u>प्रस्तावना -</u>**

७३ व्या घटना दुरुस्तीनंतर पंचायत राज संस्थांच्या अधिकारात/कामात व पंचायत राज संस्थांकडे हस्तांतरीत होणा-या निधीमध्ये व्यापक सुधारणा झाली आहे. त्यातच पंचायत राज संस्थांचा पायाभूत घटक असलेल्या ग्राम पंचायत स्तरावर मोठ्या प्रमाणात निधी खर्च करण्यात येत आहे. मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ चे कलम ५७ नुसार राज्यातील ग्रामपंचायतीच्या ग्रामनिधीचे लेखापरिक्षण करण्याचे अधिकार कलम ३ (अ-२) नुसार संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा यांना आहेत. लेखापरिक्षणातील प्रलंबित घटकांची संख्या अधिक असून,बऱ्याच ग्रामपंचायतींचे लेखापरीक्षण वेळीच होत नाही. ग्रामपंचायतींचा कारभार लोकाभिमुख व पारदर्शक होण्यासाठी ग्रामपंचायतींचे विहित कालावधीत लेखा परीक्षण होणे गरजेचे आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.१,२,३,४ व ५ अन्वये वेळोवेळी सूचना देण्यात आलेल्या आहेत.

लेखापरीक्षण पद्धती अधिक सुलभ व प्रभावी करुन, ग्रामपंचायतींचे विहित वेळेत लेखापरीक्षण होण्याच्या दृष्टीने ग्रामपंचायत लेखापरीक्षणाची सुधारीत मार्गदर्शक तत्वे तथा कार्यपद्धती वित्त विभागाने संदर्भाधीन दि.२ ऑगस्ट,२०१४ च्या शासन परिपत्रकान्वये विहित केली असून त्याचा अवलंब करण्याच्या सूचना दिल्या आहेत. प्रस्तुत सूचनांचे अनुपालन करुन ग्रामपंचायतींचे प्रलंबित लेखापरीक्षण पूर्ण करण्यासंदर्भात जिल्हा परिषदेच्या सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, तसेच उपमुख्य कार्यकारी अधिकारी(ग्रामपंचायत) यांना पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक -**

१. ग्रामपंचायत लेखा परीक्षणासाठी अपुरे मनुष्यबळ विचारात घेता सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांना सूचना देण्यात येत आहेत की, सुधारित कार्यपध्दतीनुसार ग्रामपंचायतींचे प्रलंबित लेखापरीक्षण पूर्ण करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांनी जिल्हा परिषदेकडून पुरेसे मनुष्यबळ उपलब्ध करुन द्यावे.

१.१ त्याकरिता त्यांनी ग्रामपंचायतींच्या लेखापरीक्षणाचा अनुभव असलेले विस्तार अधिकारी(ग्रामपंचायत) या पदावरील किमान दोन कर्मचाऱ्यांच्या सेवा या आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसात प्रत्येक जिल्ह्यातील संबंधित सहाय्यक संचालक,स्थानिक निधी लेखा यांचेकडे ग्रामपंचायतीचे लेखापरीक्षणाच्या कामासाठी वर्ग कराव्यात. कर्मचारी प्रत्यक्ष हजर होतील त्या तारखेपासून सेवा वर्ग झाल्या असे समजावे. तसेच, संबंधितांना जिल्हास्तरावर आवश्यक ते प्राथमिक प्रशिक्षण द्यावे.

१.२ ही व्यवस्था ग्रामपंचायत थकित लेखापरीक्षण अद्ययावत होईपर्यन्त अथवा १ वर्षापर्यन्त यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यन्त राहिल. त्यापुढे कामाची प्रगती व गरज पाहून मुदतवाढ देण्याचा विचार करता येईल.

१.३ जिल्हा परिषदेकडील उपरोक्त कर्मचाऱ्यांचे वेतन,भत्ते इत्यादी बाबी जिल्हा परिषद कार्यालयाने हाताळाव्यात. त्यासाठी आवश्यक ते उपस्थिती व रजा अहवाल उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा यांनी जिल्हा परिषदेकडे दरमहा द्यावेत व याबाबतची व्यवस्था स्थानिक स्तरावर मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी लेखापरीक्षण दौरा कार्यक्रम विचारात घेऊन निश्चित करावी.

२. ग्रामपंचायतींचे लेखापरीक्षण अद्ययावत करण्यामध्ये दुसरी अडचण लेखापरीक्षणासाठी आवश्यक अभिलेख वेळीच उपलब्ध न होणे.

२.१ त्याकरीता ग्रामपंचायत लेखा परीक्षणासाठी आवश्यक अभिलेखे लेखापरीक्षणास उपलब्ध करुन देण्यास काय अडचणी आहेत याचा बैठक घेऊन आढावा घ्यावा. लेखा परीक्षणाकरिता आवश्यक अभिलेखे कोणतीही अडचण न येता उपलब्ध करुन देण्याबाबत संबंधितांना आपण आवश्यक त्या सूचना द्याव्यात.

२.२ गट विकास अधिकारी यांनी देखील ग्रामसेवक व ग्राम विकास अधिकारी यांच्या प्रत्येक मासिक बैठकीत लेखा परीक्षणासाठी अभिलेख उपलब्ध करुन देणे या विषयाबाबत आढावा घ्यावा. तसेच, गट विकास अधिकारी यांनी, मागील महिन्यात झालेल्या लेखापरीक्षणामध्ये लेखापरीक्षणास अभिलेख उपलब्ध करुन न देण्याचा प्रकार घडला असल्यास, त्या ग्रामसेवकाविरुध्द कारवाईसाठी अहवाल तातडीने मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडे पाठवावा.

२.३ अभिलेखे जाणून बुजून लेखा परीक्षणास उपलब्ध करुन न देणा-या ग्रामसेवकाबाबतचा अहवाल गटविकास अधिका-यांकडून मुख्य कार्यकारी अधिकारी यांना प्राप्त झाल्यानंतर, मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी संबंधित ग्रामसेवका विरुध्द “महाराष्ट्र स्थानिक निधी लेखा परीक्षा (सुधारणा) अधिनियम,२०११” च्या कलम ८ मध्ये नमूद तरतूदींनुसार कडक कारवाई करावी.

२.४ लेखा परिक्षणासाठी अभिलेखे उपलब्ध करुन दिले नाहीत, अशा आशयाचा अहवाल संचालक, स्थानिक निधी लेखा यांचेकडून मुख्य कार्यकारी अधिकारी यांना प्राप्त झाल्यावर त्यावर त्यांनी तात्काळ कार्यवाही करावी व सदरचे अभिलेखे पुढील महिन्यात लेखा परीक्षणाकरिता उपलब्ध करुन देण्याची व्यवस्था करावी.

३. उपरोक्त दिलेल्या सर्व सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी होईल याची सर्वतोपरी दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०१४१११८१२००३९४४२०** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaibhav R Rajeghatge

Digitally signed by Vaibhav R Rajeghatge
DN: CN = Vaibhav R Rajeghatge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Reason: I am approving this document
Date: 2014.11.18 14:23:40 +05'30'

**वैभव राजेघाटगे**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा.मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव.
मा.मंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री(सर्व) यांचे खाजगी सचिव.

मा.विधान सभा/परिषद सदस्य (सर्व).
प्रधान सचिव, वित्त विभाग.
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-१,महाराष्ट्र,मुंबई.
महालेखापाल ( लेखा परीक्षा )-१,महाराष्ट्र,मुंबई.
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-२,महाराष्ट्र,नागपूर.
महालेखापाल ( लेखा परीक्षा )-२,महाराष्ट्र,नागपूर.
महालेखापाल,वाणिज्यिक लेखा परीक्षा,महाराष्ट्र,मुंबई.
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मुंबई.
प्रबंधक, लोकायुक्त कार्यालय,नवीन प्रशासकीय भवन,मुंबई.
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
सर्व विभागीय आयुक्त.
संचालक ( लेखा व कोषागारे), मुंबई.
संचालक, स्थानिक निधी लेखा,कोकण भवन,नवी मुंबई.
सर्व सहसंचालक, स्थानिक निधी लेखा.
मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व).
सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद.
सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत),जिल्हा परिषद.
सर्व अवर सचिव/कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
अवर सचिव, कोषा प्रशा-४, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती कार्यासन वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग.